**नांदेड वाघाळा महानगरपालिका वाढीव क्षेत्राची विकास योजना तयार करण्यासाठी उपसंचालक नगर रचना, विकास योजना, विशेष घटक औरंगाबाद (झालर क्षेत्र) औरंगाबाद हे कार्यालय नांदेड- वाघाळा शहर महानगरपालिकेकडे स्थलांतरीत करणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांक** -टिपीव्ही- २३१४/३०५/प्र.क्र.५९/१४/नवि-२७
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०००३२,
**दिनांक:**- ६ डिसेंबर, २०१४

**संदर्भ**:- १) नांदेड वाघाळा महानगरपालिका यांचा सर्वसाधारण सभा ठराव क्रमांक,९८/२०१२-१३, दि.२२.८.२०१२

२) संचालक, नगर रचना, पुणे यांची क्र. वियोविघ/ नांदेड वाघाळा, म.न.पा./ अर्थसंकल्प/७१३०, दि.७.१२.२०१२ व १७७७, दि.३.४.२०१४ ची पत्रे.

**प्रस्तावना:-**

नांदेड-वाघाळा महानगरपालिकेने सर्वसाधारण सभा ठराव क्र.९८/२०१२-१३, दि.२२.८.२०१२, अन्वये महाराष्ट्र प्रादेशिक व नगर रचना अधिनियम, १९६६ चे कलम २१ मधील तरतुदीनुसार नांदेड-वाघाळा महानगरपालिकेच्या वाढीव क्षेत्राची विकास योजना तयार करण्यास मान्यता दिलेली आहे. तसेच सदर विकास योजना तयार करण्यासाठी विशेष घटक कार्यालय महानगरपालिकेच्या आस्थापनेवर घेवून सदर घटकाचे अधिकारी/कर्मचारी यांचे वेतन व भत्ते यावरील खर्च करण्यासही महानगरपालिकेने मंजूरी दिलेली आहे.

२. उपसंचालक, नगर रचना, विकास योजना, विशेष घटक, औरंगाबाद (झालर क्षेत्र) औरंगाबाद हे कार्यालय औरंगाबाद (झालर क्षेत्र) साठी नियुक्त करण्यात आले आहे. सद्यस्थितीत उक्त कार्यालयाचा, औरंगाबाद (झालर) क्षेत्रासाठीचा सुधारीत विशेष घटक योजना नकाशा प्रसिध्द झाला असून त्यानुसार नियोजन समितीचे काम चालू आहे. तसेच याबाबत सिडकोकडून कलम ३० अन्वये अहवाल शासनास सादर केला जाणार आहे.

**शासन निर्णय:-**

नांदेड-वाघाळा महानगरपालिकेच्या वाढीव क्षेत्रासाठी विकास योजना तयार करण्याबाबत महानगरपालिकेने दि.२२.०८.२०१२ अन्वये केलेल्या ठराव तसेच सध्याच्या उपसंचालक, नगर रचना, विकास योजना, विशेष घटक औरंगाबाद (झालर क्षेत्र) कार्यालयाकडील औरंगाबाद (झालर क्षेत्रा) च्या विकास योजनेची सद्यस्थिती विचारात घेऊन उपसंचालक, नगर रचना विकास योजना, विशेष घटक, औरंगाबाद (झालर क्षेत्र) हे कार्यालय सदर कार्यालयाच्या आस्थापनेवरील पुढील तक्त्यात नमूद

केलेल्या १८ अस्थायी पदांसह नांदेड-वाघाळा शहर महानगरपालिका, नांदेड करीता त्या महानगरपालिकेच्या वाढीव क्षेत्राची विकास योजना तयार करण्यासाठी दिनांक १.१.२०१५ पासून उपसंचालक, नगर रचना, विकास योजना, विशेष घटक, नांदेड वाघाळा शहर महानगरपालिका म्हणून स्थलांतरीत करण्यास शासनाची याद्वारे मंजूरी देण्यात येत आहे.

| अ.क्र. | पदांचे नांव | वेतनश्रेणी | ग्रेड वेतन | एकूण पदे |
|---|---|---|---|---|
| १ | उपसंचालक, नगर रचना (राजपत्रित गट-अ) | १५६००-३९१०० | ७६०० | १ |
| २ | नगर रचनाकार (राजपत्रित गट-अ) | १५६००-३९१०० | ५४०० | १ |
| ३ | सहायक नगर रचनाकार | ९३००-३४८०० | ४४०० | २ |
| ४ | रचना सहायक | ९३००-३४८००<br>९३००-३४८०० (५ वर्षाच्या अर्हताकारी सेवेनंतर सहायक नगर रचनाकार) | ४३००<br>४४०० | ३ |
| ५ | उच्चश्रेणी लघुलेखक | ९३००-३४८०० | ४४०० | १ |
| ६ | वरिष्ठ लिपिक | ५२००-२०२०० | २४०० | १ |
| ७ | सहायक आरेखक | ५२००-२०२००<br>९३००-३४८०० (४ वर्षाच्या अर्हताकारी सेवेनंतर) | २८००<br>४३०० | १ |
| ८ | कनिष्ठ आरेखक | ५२००-२०२००<br>९३००-३४८०० (५ वर्षाच्या अर्हताकारी सेवेनंतर) | २४००<br>४२०० | ३ |
| ९ | कनिष्ठ लिपिक | ५२००-२०२०० | १९०० | २ |
| १० | शिपाई | ४४००-७४४० | १३०० | ३ |
| | एकूण | | | १८ |

३. स्थलांतरित करण्यात आलेल्या सदर कार्यालयाच्या आस्थापनेवरील कर्मचाऱ्यांच्या वेतन व भत्त्यावरील खर्च नांदेड-वाघाळा शहर महानगरपालिकेने करावयाचा आहे. तसेच उप संचालक, नगर रचना विकास योजना, विशेष घटक नांदेड-वाघाळा शहर महानगरपालिका, नांदेड या कार्यालयातील उपरोक्त अस्थायी पदांची मुदतवाढ दि.२८.२.२०१५ पर्यंत चालू राहील.

४. प्रस्तुत विकास योजना, विशेष घटक, औरंगाबाद (झालर क्षेत्र), औरंगाबाद हे कार्यालय विकास योजना विशेष घडक नांदेड-वाघाळा शहर महानगरपालिका, नांदेड म्हणून महानगरपालिकेकडे वर्ग करण्याची कार्यवाही संचालक, नगर रचना, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी त्यांच्या स्तरावर तात्काळ करावी. तसेच, सध्या विकास योजना विशेष घटकासाठी मंजूर १८ पदांपैकी रिक्त असलेल्या

पदांवरही अधिकारी/कर्मचारी उपलब्ध करुन देण्याबाबत संचालनालयाच्या स्तरावर कार्यवाही करण्यात यावी.

**५.** सदर शासन परिपत्रक, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून, त्याचा संकेताक २०१४१२०६१६५४०१००२५ असा आहे. हे शासन परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Siddharam Karbasayya Salimath

Digitally signed by Siddharam Karbasayya Salimath
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Siddharam Karbasayya Salimath
Date: 2014.12.06 17:40:07 +05'30'

**(सिध्दाराम सालीमठ)**
**उपसचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) विभागीय आयुक्त, औरंगाबाद.
२) जिल्हाधिकारी, नांदेड/औरंगाबाद.
३) संचालक, नगर रचना, महाराष्ट्र राज्य, पुणे (पाच प्रतीसह).
४) संचालक तथा सह सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
५) महालेखापाल, महाराष्ट्र-१ मुंबई / महाराष्ट्र-२ -नागपूर.
६) सहसंचालक, नगर रचना, औरंगाबाद विभाग, औरंगाबाद.
७) आयुक्त, औरंगाबाद महानगरपालिका, औरंगाबाद.
८) आयुक्त, नांदेड वाघाळा शहर महानगरपालिका, नांदेड
९) उप सचिव (नवि-२७) नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१०) सहायक संचालक, नगर रचना, नांदेड शाखा.
११) जिल्हा कोषागार अधिकारी, नांदेड/औरंगाबाद.
१२) नगर रचनाकार, नांदेड/औरंगाबाद (झालर क्षेत्र)
१३) कक्ष अधिकारी, नवि-४, नवि-१३.
१४) निवड नस्ती (नवि-२७).